**कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाच्या पुनर्विकास प्रकल्पाकरीता भांडवली अर्थसहाय्य उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कोचिन-२०१४/प्र.क्र.१८/सां.का.१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१८.

वाचा : १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.कोचिन-२०१४/प्र.क्र.१८/सां.का.१, दि.११.०९.२०१४.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.कोचिन-२०१४/प्र.क्र.१८/सां.का.१, दि.२७.०२.२०१७, दि.२९.०३.२०१७,
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.कोचिन-२०१४/प्र.क्र.१८/सां.का.१, दि.१८.०२.२०१८, दि.३१.०३.२०१८
४) व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ म. यांचे पत्र क्र.कोचिन-२०१८/०१५, दि.१८.०५.२०१८ व क्र.कोचिन-२०१८/०२६, दि.२७.०८.२०१८

**प्रस्तावना :**

कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाच्या पुनर्विकासाच्या कामांकरीता दि.११.०९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये एकूण रु.१७,०३,६८,९०३/- खर्चास प्रशासकीय मान्यता देऊन सन २०१४-१५ मध्ये रु.५.४० कोटी, सन २०१६-१७ मध्ये रु.६.०० कोटी असे आणि सन २०१७-१८ मध्ये रु.२.४० कोटी एकूण रु.१३.८० कोटी इतकी रक्कम वितरीत करण्यात आली आहे. सदर वितरीत निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ यांनी सादर करुन दि. १८.०५.२०१८ च्या पत्रान्वये या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित रु. २,५९,९३,०६२/- इतका निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली होती. तथापि वित्त विभागाने ७०% च्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन दिला असल्याने रु.२.१० कोटी इतका निधी उपलब्ध आहे. त्यानुसार सदर निधी कोल्हापूर चित्रनगरीस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

विचाराअंती कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भागभांडवलाप्रित्यर्थ रु.२,१०,००,०००/- (रुपये दोन कोटी दहा लाख फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास पुढील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विनियोग दि.११.०९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या प्रयोजनासाठीच करण्यात यावा.

२) दि.११.०९.२०१४ च्या शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती या प्रकरणी लागू राहतील.

३) शासनाने भांडवली कामासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीची गणना कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाच्या भांडवलातील शासनाच्या सहभागात करण्यात यावी.

४) शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीचे सनदी लेखापालांनी प्रमाणित केलेले विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

५) महामंडळाने केलेल्या खर्चाच्या विवरणाबरोबरच कामांची प्रगती व भौतिक साध्य याची तपशिलवार माहिती संचालक मंडळाच्या मान्यतेने शासनाला अवगत करण्यात यावी.

**२.** यासाठी उप सचिव(सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून कार्यासन अधिकारी (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर यांना सदर रक्कम एकरकमी वितरीत करावी.

**३.** यासाठी होणारा खर्च "क्र.झेड-डी-५, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च (००) (०२) कोल्हापुर चित्रनगरी महामंडळाला भाग भांडवली अंशदान (४२०२ ०७८५) ५४-गुंतवणुका" या योजनांतर्गत लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

**४.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि ०२.०४.२०१८ अन्वये सदर खर्च मंजूरीचे अधिकार विभागास प्राप्त झाले असून सदर शासन निर्णयातील परिच्छेद ६-क, ८ यांची पूर्तता होत आहे व परिच्छेद ६-अ, ६-ब, ७ ते १० मधील अटी तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील तपासणी सूचीमधील अटींची पूर्तता होत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८११२९१२४६०२९८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2018.11.30 15:20:58 +05'30'

**( शैलेश तु.जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४. सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा)-एक, महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल, (वाणिज्यिक लेखा परीक्षा)-एक, महाराष्ट्र,मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

११. वित्त विभाग (सा.उ. / व्यय-१४ /अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
    a. (यांना उक्त अनुदानाची रक्कम BDS द्वारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित)
१४. कक्ष अधिकारी (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती, सां.का.१.